सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता भागभांडवली अंशदानाची तरतुद वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ (मर्यादित)

महाराष्ट्र शासन
इतर मागास बहुजन कल्याण विभाग,
शासन निर्णय क्रमांक- इमाव २०२१/प्र.क्र.३५/महामंडळे
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १६ फेब्रुवारी, २०२२

संदर्भ :- शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. इमाव-२०१२/ प्र.क्र. २८१/ महामंडळे, दि. २१.११.२०१२

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास मंडळाच्या अधिकृत भागभांडवलाची मर्यादा रु. २५०.०० कोटी इतके आहे. आतापर्यंत शासनामार्फत भरणा झालेले भागभांडवल रु. ११२.०५ कोटी इतके असून अद्याप रु. १३७.९५ कोटी इतके भागभांडवली अंशदान महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळास उपलब्ध करून द्यावयाचे आहे. ही बाब विचारात घेऊन लाभार्थी महामंडळांच्या योजनांपासून वंचित राहू नयेत याकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता भाग भांडवली अंशदान या अंतर्गत रु. ५.०० कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. सदर महामंडळास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता रु. ५.०० कोटी ( रुपये पाच कोटी फक्त) एवढे भागभांडवली अंशदान खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. योजनांतर्गत निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलात आणावेत. तसेच ज्या योजनेसाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच योजनेसाठी निधी खर्च करण्यात यावा.
२. व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.
३. विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती व त्यावर केलेला खर्च याची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.
४. कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.
५. महामंडळाने कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी ठोस प्रयत्न करावेत.
६. सदर योजनेचा निधी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासण्याच्या अधीन वितरीत करण्यात येत आहे.
७. उपरोक्त निधीचा खर्च करतांना संबंधित अधिकाऱ्यांनी सर्वसाधारण वित्तीय नियम, योजनेच्या अटी व शर्ती, CVC मार्गदर्शक सूचना, CAG निरीक्षणे इ. अनुपालन करून निधीचा विनियोग करावा.

**०२.** वरील अनुदानाबाबत सह सचिव/ उप सचिव (रोखशाखा), इतर मागास बहूजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम आहरित करण्यासाठी, कक्ष अधिकारी (रोखशाखा), इतर मागास बहूजन कल्याण विभाग यांनाआहरण व संवितरण अधिकारी, म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त व विकास महामंडळ (मर्यादित), मुंबई यांस संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

**०३.** याबाबीवर खर्च मागणी क्र. झेडजी-०४, ४२२५, अनुसुचित जाती, अनुसुचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण यावरील भांडवली खर्च, ०३, मागासवर्गाचे कल्याण, १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर क्षेत्रातील गुंतवणूका, (०१) भागभांडवली अंशदान, (०१) (०२) महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त व विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२२५१९३१), ५४ गुंतवणुका या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**०४.** हा शासन निर्णय वित्त विभागाच्याअनौपचारिक संदर्भ क्र. ६५५ / दि.०४.०२.२०२२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१६११५२१७४६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARSHA SUNIL SAMANT

Digitally signed by VARSHA SUNIL SAMANT
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=OTHER BACKWARD BAHUJAN KALYAN DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=765dae4fef3315c4544a15270edc443fbacf630172f5e6b732d16b64198d81ba,
serialNumber=af4e3a3aadaca1026547ef614df4de89d66994806d3760116b32bb3aadeaf9fb, cn=VARSHA SUNIL SAMANT
Date: 2022.02.16 11:53:47 +05'30'

**(व.सु.सामंत)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहूजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ, चेंबूर, मुंबई
३. महालेखापाल (ले व अ) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर
४. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी मुंबई /ठाणे
६. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
७. वित्त विभाग (का- व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ) मंत्रालय, मुंबई
८. नियोजन विभाग (का. १४१३), मंत्रालय, मुंबई.
९ . सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई
१०. उप सचिव/ कक्ष अधिकारी (रोखशाखा), इतर मागास बहूजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (महामंडळे)